# बुकर टी. वॉशिंग्टन

# पन्नास सेंट्स आणि एक स्वप्न



जबरी आसिम

चित्रं : ब्रायन कोलियर

बुकरने शब्दांशी मैत्री करण्याचं स्वप्न पाहिलं. त्याने पुस्तकांमध्ये राहणाऱ्या रहस्यांना मुक्त करण्याचं ठरवलं.

गुलामीत जन्माला आलेला बुकर टी. वॉशिंगटन फक्त वाचायला आणि लिहायला शिकण्याचंच स्वप्न पाहू शकत होता. मुक्त झाल्यानंतर तरुण बुकरने कॉलेजची डिग्री मिळवण्यासाठी हॅम्पटन इन्स्टिट्यूटकडे, चालत, पाचशे मैलांच्या प्रवासाला सुरुवात केली. जेव्हा तो हॅम्पटन इन्स्टिट्यूटला पोहोचला, तेव्हा त्याच्या खिशात फक्त पन्नास सेंट्स होते आणि एक मोठं स्वप्न जे सत्यात उतरणार होतं. एक गुलाम जो कधीकाळी शाळेच्या बाहेर वाट बघत उभा असे, तो एके दिवशी स्वतंत्र झालेल्या पूर्वीच्या गुलामांचा एक महान शिक्षक बनला.



# बुकर टी. वॉशिंग्टन

# पन्नास सेंट्स आणि एक स्वप्न





दुसऱ्या कोणत्याही मुलासारखं बुकरला पण निळ्या आकाशाखाली आणि शुभ्र उन्हात खेळायची, बागडायची, उड्या मारायची इच्छा होती.
सर्वात जास्त त्याला शिकायची इच्छा होती. बुकर शब्दांशी मैत्री करण्याचं, पुस्तकांमध्ये लपलेल्या रहस्यांना मुक्त करण्याचं स्वप्न पाहत होता.

कागदावर विचित्र खुणा उड्या मारत, नाचत. त्यांना पाहून बुकर खूष होऊन हसत असे.
पण त्याच्यासारख्या गुलामांना वाचायची परवानगी नव्हती. पुस्तकं हातात घेतलेल्या काळ्या मुलाला पकडून मारलं जात असे किंवा त्याहून वाईट शिक्षा मिळत असे.

जेव्हा तो त्याच्या मालकाच्या मुलीला शाळेत सोडायला जायचा, तेव्हा तो तिची पुस्तकं उचलायचा आणि प्रत्येक पुस्तकाच्या कव्हरवरून बोटं फिरवायचा. त्याला पुस्तकं हाताळताना त्यांतली जादू जाणवायची.



मालकाची मुलगी वर्गात तिच्या वर्गमित्रांबरोबर वाचत असे-
"A ‘ॲपल’चा (सफरचंद). B ‘बर्ड’चा (पक्षी)."
बुकर बाहेर उभा राही. व्हर्जिनियाच्या उष्ण वातावरणात निळ्या आकाशाखाली आणि कडक उन्हात, खिडकीतून आत पाहत तो उभा राही.
तो ऐकत असे आणि स्वप्नं पाहत असे.





स्वतंत्र झाल्यावरसुद्धा, अजूनही त्याचं
आयुष्य खडतर होतं.
बुकरचं कुटुंब व्हर्जिनियाहून
वेस्ट व्हर्जिनियाला आलं.
तो आणि त्याचा भाऊ त्यांच्या सावत्र
वडिलांबरोबर मिठाच्या भट्टीत काम
करायला जाऊ लागले.
कनाव्हाच्या दरीत खोलवर तो फावडं
मारून, मीठ उपसून, ते
भरत असे.

नंतर, माल्डेनच्या एका कोळशाच्या खाणीत;
खाणकामगार आणि मशीन,
जमीन हजारो फूट खोल खणत असत.
कोळशापर्यंत पोहोचण्यासाठी.
प्रौढ माणसांसाठीही ते एक अतिशय
उष्णतेतलं आणि धोक्याचं काम होतं आणि
बुकरसारख्या मुलांसाठी तर खूपच जास्त.
असा अंधार बुकरने आधी कधीच पाहिला
नव्हता.



एके दिवशी आईने त्याला आश्चर्यचकितच केलं:

तिने खास बुकरसाठी स्पेलिंगचं एक पुस्तकं आणलं.

बुकर आता ABC शिकू लागला, पानभर नाचणारी ती विचित्र अक्षरं गिरवू लागला.

लवकरच ती अक्षरं त्याला कळू लागली.

"A ॲपलचा (सफरचंद). B बर्डचा (पक्षी)."

शेवटी त्याला वाचता येऊ लागलं.

जेव्हा ओहियोहून एक तरुण मुलगा शहरात आला,
तेव्हा त्या अद्‌भुत अनोळखी माणसाची बातमी एका केबिनपासून दूसऱ्या केबिनपर्यंत पटापट पसरली.
तो एक असा कृष्णवर्णीय माणूस होता, जो वाचू शकत होता!
लोकांना काम संपल्यावर एकत्र यायला आणि त्याने वाचलेल्या रोजच्या बातम्या ऐकायला खूप आवडायचं.
छोटा बुकरही त्याने वाचलेलं ऐकायचा आणि स्वप्न बघायचा.





रोज बुकर भल्या पहाटे उठायचा आणि लगेच कामाला लागायचा.
तो फावडं मारून, मीठ उपसून, ते भरायचा.
आणि मग निग्रोंच्या शाळेकडे धाव घ्यायचा.
एका छोट्याशा, गच्च भरलेल्या खोलीत बुकर त्याचे पाठ शिकला.
"A 'ॲपल'चा (सफरचंद). B 'बर्ड'चा (पक्षी)."
बुकर ऐकत असे, शिकत असे, आणि स्वप्न बघत असे.
पण त्याला यापेक्षा जास्त काहीतरी हवं होतं.

लहान असतानाच त्याने एका अद्‌भुत
शाळेविषयी ऐकलं होतं.
त्या शाळेचं नाव होतं
हॅम्पटन इंस्टिट्यूट.
निग्रो तिथे लिहायला शिकू शकत होते.
त्याबरोबरच शेती, विज्ञान आणि इतर
कितीतरी गोष्टी शिकू शकत होते.
आणि त्यांना हवी ती सगळी पुस्तकं वाचू
शकत होते.
बुकर हे ऐकत असे आणि स्वप्न पाहत
असे.
हॅम्पटन कुठे होतं, तो तिथे कसा जाणार
होता, हे काहीच त्याला माहीत नव्हतं.
फक्त इतकंच माहीत होतं की
कोणत्याही परिस्थितीत त्याला तिथे
जायचंच होतं!



पुढे दीड वर्षं बुकरने काम केलं आणि पैसे जमवले. शाळेचं स्वप्न बघत-बघतच.

तरीही अजून त्याच्याकडे खूपच कमी पैसे होते आणि अंगात घालायला काही फटके कपडे. त्याचे मित्र आणि कुटुंबियांकडेही फार काही नव्हतं -
एखादं नाणं, काही आणे आणि एखादा रूमाल!
पण त्यांनी त्यांच्याकडे जे काही होतं ते त्याला दिलं.

त्याच्या वय झालेल्या शेजाऱ्यांनी त्यांचं बहुतांश आयुष्य गुलामीतच काढलं होतं. त्यांनी बुकरला सांगितलं की त्यांच्यातलाच एकजण कधी बोर्डिंग स्कूलमध्ये जाऊन शिकेल, अशी त्यांनी कधी कल्पनाही केली नव्हती.
बुकरने ते ऐकलं आणि तो त्यांची स्वप्नंही सोबत घेऊन गेला.





हॅम्पटन इंस्टिट्यूटचा पाचशे मैलांचा
बहुतांश प्रवास त्याने चालतच केला.
व्हर्जिनियाचे डोंगर पार करून
समुद्रापर्यंत, असा तो अनेक दिवसांचा
प्रवास होता.
त्याच्या थकलेल्या हाडांना वारा बोचत
असे,
आणि टणक जमिनीवर चालून त्याचे
पाय दुखत असत.

तरीही तो चालत राहिला.

हॅम्पटनपासून जवळपास ब्याऐंशी मैल दूर असलेल्या रिचमंडला पोहोचेपर्यंत त्याच्याकडचे सगळे पैसे संपले.

तो इतका थकलेला आणि भुकेलेला होता की त्याला पाऊल उचलणंही अवघड झालं.
ते मोठं शहर भीतीदायक आणि गोंधळून टाकणारं वाटत होतं.
तिथे अनेक सावल्या होत्या, आणि मित्र मात्र एकही नव्हता!





खिशात एक पैसाही नसताना बुकर रस्त्यांवरून मध्यरात्र होईपर्यंत किंवा त्यानंतरही चालत राहायचा. तो खाण्याच्या पदार्थांच्या दुकानांकडे बघत राहायचा, जिथे रचून ठेवलेलं तळलेलं चिकन आणि मिठाईचा गोड वास पसरलेला असे. त्याने त्याच्या तोंडाला पाणी सुटत, आणि त्याच्या रिकाम्या पोटातून गुडगुड आवाज येत, कडाडत्या विजेसारखे.

तिथे त्याला ब्रेडचा एक तुकडा किंवा दुधाचा एक घोट तरी मिळणार होता का!

इतक्या कष्टांनी पायपीट करत, थंडीत, उदास आकाशाखाली त्याचा धीर सुटला असता. तेव्हा त्याने मनात हॅम्पटनमधल्या वाचनालयाची कल्पना केली, जिथली कपाटं जादू आणि रहस्यांनी भरलेली होती.

मग त्याला आतून एक आवाज ऐकू आला, जो त्याला पुढे जात राहायला सांगत होता. त्याने तो आवाज ऐकला आणि स्वप्न पाहिलं.

त्याला एका जहाजातून माल उतरवायचं काम मिळालं आणि नाश्त्यासाठी अन्न विकत घेण्याइतके पैसे तो कमवू लागला. मजुरांनी माल बांधताना, उचलून वाहताना कष्टाची गाणी गायली. त्यांच्या आवाजांनी बुकरला त्याचे मिठाच्या खाणीतले दिवस, त्याचे मित्र आणि कुटुंबाची आठवण आली, ज्यांना तो आता खूप मागे सोडून आला होता.

त्याने माल उचलून त्याचा ढीग रचला- त्याची पाठ दुखू लागली आणि त्याचे पातळ कपडे घामाने भिजून गेले, तोपर्यंत. दिवसांमागून दिवस गेले.
हळूहळू त्याने प्रवासाला पुरतील इतके पैसे जमवले.





शेवटी जेव्हा तो हॅम्पटनला पोहोचला, तेव्हा तिथल्या विटांच्या मोठ्या इमारतीला बघून त्याचं मन प्रकाशाने भरून गेलं.

त्याच्या खिशातले पन्नास सेंट आणि त्याच्या मनातलं स्वप्न सोबत असताना, बुकरला एका जादूने त्याचं स्वागत केल्यासारखं वाटलं..



शाळेची फी वर्षाला सत्तर डॉलर इतकी होती- पन्नास सेंटपेक्षा कितीतरी जास्त. बुकरने रखवालदाराचं काम करून त्याची फी भरली.

पुन्हा तो पहाटे उजाडताच उठून झाडायचा, साफसफाई आणि इतर कामं करून मग वर्गात जायचा.

तरीही त्याची कमाई पुरेशी नव्हती.

पण त्याची मेहनत पाहून इतर लोक त्याला मदत करण्यासाठी प्रेरित झाले.

आणि मग बुकर त्यांचीही स्वप्नं घेऊन पुढे जाऊ लागला.

तो याआधी कधीच नियमितपणे दोन वेळा जेवला नव्हता, किंवा पलंगावर दोन चादरींच्या मध्ये कधीच झोपला नव्हता.

हॅम्पटनमधलं त्याचं जीवन अगदी त्याला हवं तसं होतं- त्यापेक्षाही जास्त.



बुकरसाठी त्याचे शिक्षक
सर्वात मोठा चमत्कार होते.
ते हुशार आणि दयाळू होते.
त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना
आपलं ज्ञान इतरांबरोबर
वाटायला शिकवलं.
हे शक्य होतं की कदाचित
त्यातले काही विद्यार्थी मोठे
होऊन त्यांच्या स्वतःच्या शाळा
सुरु करतील.

"A ‘ॲपल’चा (सफरचंद). B ‘बर्ड’चा (पक्षी)" पासून बुकर आता कितीतरी पुढे आला होता.

पण पाचशे मैल चालल्यावर आणि त्याचं एक स्वप्न सत्यात उतरल्यानंतरसुद्धा अजून ही बुकरच्या प्रवासाची सुरुवातच होती.

आपल्या टेबलावर बसून, आजूबाजूला असलेल्या पुस्तकांच्या ढिगांनी वेढलेला बुकर ऐकत असे, आणि स्वप्न बघत असे.



## बुकर टी. वॉशिंग्टनबद्दल



बुकर टी. वॉशिंग्टन (१८५६ -१९१५) हा एक राष्ट्रीय नेता आणि त्याच्या काळातल्या प्रख्यात आफ्रिकन-अमेरिकन व्यक्तींपैकी एक बनला, त्याआधी १८७५ मध्ये त्याने हॅम्पटन इंस्टिट्यूटमधून सन्मानाने पदवी मिळवली. आज तो टस्केगी इंस्टिट्यूट या एका प्रसिद्ध विद्यापिठाचा संस्थापक म्हणून लोकांच्या स्मरणात आहे. त्याच्या मृत्यूच्या वेळी, इंस्टिट्यूटच्या परिसरात शंभराहून जास्त इमारती, पंधराशेहून अधिक विद्यार्थी आणि जवळजवळ दोन मिलियन डॉलर इतकी देणगी जमा झालेली होती. तो फक्त पुस्तके वाचायलाच शिकला नाही, तर ती लिहायलाही शिकला. त्याच्या चौदा पुस्तकांपैकी सर्वात प्रसिद्ध आहे "अप फ्रॉम स्लेव्हरी" हे त्याचं दुसरं जीवनचरित्र.

## त्याच्या प्रवासाबद्दल अधिक माहिती

• वॉशिंग्टनच्या बालपणीच्या काळात, १८३१ आणि १८३२ मध्ये, व्हर्जिनियातील कायद्यानुसार गुलामांना आणि मुक्त झालेल्या कृष्णवर्णीयांना लिहायला-वाचायला शिकवणं हा गुन्हा होता.

• वॉशिंग्टन याने त्याच्या मालकाच्या मुलीच्या वर्गात ऐकलेले नेमके धडे किंवा त्यांचं वर्णन केलेलं नाही, पण "द लिटिल वन्स लॅडर" या त्याच्या तरुणपणी प्रकाशित झालेल्या प्राइमर पुस्तिकेत दिल्याप्रमाणे "A 'ॲपल'चा (सफरचंद). B 'बर्ड'चा (पक्षी)" यासारखं काही ऐकलं असावं. त्याच्या आईने नंतर त्याला दिलं ते पुस्तक होतं "नोहा वेबस्टर - द अमेरिकन स्पेलिंग बुक", ज्याला "ब्लू बॅक स्पेलर" असंही म्हटलं जाई.

• वेस्ट व्हर्जिनियातील मिठाच्या खाणीत, वॉशिंग्टनच्या सावत्र वडिलांच्या पिंपांवर, त्यांना ठरवून दिलेला १८ हा आकडा लिहिलेला असे. छोट्या वॉशिंग्टनने ओळखायला शिकलेला हा पहिला आकडा होता.

• चौकीदार म्हणून वॉशिंग्टनचा पगार महिन्याला दहा डॉलर इतका होता, ज्यामध्ये फक्त त्याच्या खोलीचं भाडं आणि जेवणाचा खर्च भागत असे. हॅम्पटन इंस्टिट्यूटमधील शैक्षणिक फी (दरवर्षी सत्तर डॉलर) न्यू बेडफोर्ड, मॅसाचुसेट्सच्या मिस्टर एस. ग्रिफिट्स मॉर्गन यांनी भरली. हॅम्पटन इंस्टिट्यूटचे संस्थापक आणि प्रमुख ब्रिगेडियर जनरल सॅम्युअल सी. आर्मस्ट्राँग यांनी वॉशिंग्टनना ही शिष्यवृत्ती मिळवून देण्यात मदत केली.

१८५६- बुकर टी. वाशिंगटन, जेम्स बरो नावाच्या मालकाच्या तंबाखूच्या शेतात व्हर्जिनियाजवळ एक गुलाम म्हणून जन्माला आला.

१८६१- नागरी युद्ध सुरु झालं.

१८६५ - युद्ध संपलं, आणि राज्यांनी औपचारिकपणे गुलामगिरी संपवून तेरावी दुरुस्ती मंजूर केली. वॉशिंग्टन मुक्त झाला.

१८६५-१८७१ - वॉशिंग्टनने एका मिठाच्या खाणीत काम करायला सुरुवात केली, आणि नंतर कनाव्हा व्हॅली येथे, वेस्ट व्हर्जिनियामधल्या माल्डेन येथे एका कोळशाच्या खाणीत काम केलं. तो पहिल्यांदा एका स्थानिक शाळेत शिकू लागला.

१८७२ - वॉशिंग्टनने हॅम्पटन इंस्टिट्यूटकडे पाचशे मैल लांबच्या प्रवासाला सुरुवात केली.

१८७५ - वॉशिंग्टनने हॅम्पटन इंस्टिट्यूटमधून सन्मानाने पदवी मिळवली.

१८७५-१८७७ – वॉशिंग्टनने माल्डेनमध्ये तो स्वतः शिकला होता त्याच शाळेत शिकवलं. त्या पगारातून हॅम्पटन इंस्टिट्यूटमध्ये त्याच्या भावाच्या शिक्षणाची फी भरली.

१८७९-१८८१- वॉशिंग्टनने हॅम्पटन इंस्टिट्यूटमध्ये शिकवलं.

१८८१ - वॉशिंग्टनने अलबामाच्या एका जुन्या चर्चचं टस्केगी इंस्टीट्यूटमध्ये रुपांतर केलं, जिथे सुरुवातीला तीस आफ्रिकन-अमेरिकन विद्यार्थी शिकायला आले.

१८८२ – विद्यार्थ्यांनी स्वतः हाताने बनवलेल्या विटांपासून टस्केगी इंस्टिट्यूटची पहिली इमारत बांधली.

१८९५ - वॉशिंग्टनने अटलांटा, जॉर्जिया येथे एका आंतरराष्ट्रीय एक्सपोझिशनमध्ये भाषण दिलं. ज्यात त्याने गोऱ्या आणि आफ्रिकन-अमेरिकन समुदायांमधल्या सहकार्यावर भर दिला. त्यांच्या भाषणाला नंतर वॉशिंग्टनच्या टीकाकारांनी "अटलांटाची तडजोड" असं म्हटलं.

१८९६ – वॉशिंग्टन ही हार्वर्ड विद्यापिठाकडून मानद पदवी मिळालेली पहिली आफ्रिकन-अमेरिकन व्यक्ती ठरली.

१९०० – वॉशिंग्टनचं पहिलं आत्मचरित्र, "द स्टोरी ऑफ माय लाइफ ॲंड वर्क" प्रकाशित झालं. वॉशिंग्टनने नॅशनल निग्रो बिझनेस लीगही स्थापन केलं.

१९०१ – वॉशिंग्टनचं दुसरं आत्मचरित्र "अप फ्रॉम स्लेव्हरी", प्रकाशित झालं आणि ते अत्यंत लोकप्रिय झालं. त्याच वर्षी वॉशिंग्टनने व्हाइट हाउसमध्ये राष्ट्रपती थियोडोर रूजवेल्टबरोबर जेवण केलं. त्यानंतर एक वाद झाला.

१९१५ – वॉशिंग्टनचा त्याच्या टस्केगी, अलबामा येथील घरी मृत्यू झाला.

# लेखकाची टीप



काही वर्षांपूर्वी, मी ज्या घरात मोठा झालो, त्या घरात एक कपाट आवरताना, मला बऱ्याच काळापासून हरवलेलं एक जिग-सॉ कोडं सापडलं. मी लहान असताना माझ्या आई-वडिलांनी मला नाताळची भेट म्हणून ते कोडं दिलं होतं. त्या कोड्यावर बुकर टी. वॉशिंग्टनचं एक कृष्णधवल (काळ्या-पांढऱ्या रंगातलं) चित्र होतं. मला आठवतंय की शाळेच्या हिवाळ्याच्या सुट्टीत मी हे जिग-सॉ चित्र जुळवायचा खूप प्रयत्न केला होता. जेव्हा माझ्या खिडकीच्या बाहेर बर्फ पडत असायचा, तेव्हा मी प्रत्येक तुकड्याला उलटून पाहायचो. हळूहळू मी सगळे तुकडे नीट जुळवले आणि मग वॉशिंग्टनचं चित्र माझ्या डोळ्यांसमोर उभं राहिलं.

ते कोडं ज्या फोटोवरून बनलेलं होतं, तो आता इंटरनेटवर सहजपणे उपलब्ध आहे. आज तो फोटो बघताना मला आठवतंय की तो पहिल्यांदा पाहिला तेव्हा मला भीती वाटली होती. फोटोत वॉशिंग्टन नेहमी दिसतात त्याप्रमाणे कणखर आणि गंभीर, ताठ कॉलरचा शर्ट आणि गळ्याशी घट्ट टाय अशा रुपात दिसत. त्यांच्या मांडीवर एक उघडलेले पुस्तक असे. माझ्या तरुण डोळ्यांना ते एका कडक मुख्याध्यापकाप्रमाणे दिसत- ज्ञानी, मागणी करणारे, आणि एखाद्या खोडकर विद्यार्थ्याच्या थेट अंतरंगात पाहू शकणारे.

मी जसा-जसा मोठा होत गेलो तसं मला कळत गेलं की वॉशिंग्टन हे काही साधारण, शूरवीर नायक म्हणतात तसे नव्हते. माझ्या लक्षात आलं की ती एक गुंतागुंतीची आणि खरं तर विवादास्पदसुद्धा व्यक्ती होती. त्यांच्या निग्रोंच्या उन्नातीबद्दलच्या विचारांचा, कृष्णवर्णीय नेतृत्वातील त्यांचे प्रमुख प्रतिस्पर्धी डब्ल्यू. ई. बी. द्यू बुआ यांच्या विचारांशी वारंवार संघर्ष होत असे. कालांतराने, वॉशिंग्टनना एक दिशाभूल झालेली व्यक्ती म्हणून पाहिलं जाऊ लागलं, ज्यांनी विरोधापेक्षा तडजोड करणं पसंत केलं. "अटलांटाची तडजोड" हे त्याचं एक उदाहरण. १९६०च्या दशकापर्यंत, वॉशिंग्टनचं नाव “तत्त्वहीन" म्हणून गणलं जाऊ लागलं. वॉशिंग्टन पोस्टचे समीक्षक जोनाथन यार्डली यांनी लिहिलं,“इतर महान अमेरिकन व्यक्तींच्या तुलनेत बुकर टी. वॉशिंग्टनबरोबर इतिहासाने खूपच जास्त क्रूर व्यवहार केला. त्यांना बदनाम केलं गेलं आणि त्यांची खिल्ली उडवली गेली, तरीही कोणत्याही निकषानुसार त्यांचं जीवन असामान्य होतं."

अलिकडच्या वर्षांमध्ये वॉशिंग्टनच्या प्रतिष्ठेचं पुनर्मूल्यांकन केलं गेलं आहे. रॉबर्ट नॉरेलच्या 2009 मध्ये लिहिलेल्या वॉशिंग्टनच्या "अप फ्रॉम हिस्ट्री“ या चरित्रात वॉशिंग्टनला एक निर्भय, आशावादी व्यक्ती म्हणून चित्रित केलं आहे, ज्यांनी आपल्या लोकांच्या हितासाठी सातत्याने त्यांच्या ध्येयाचा पाठलाग केला. नॉरेल लिहितात की १८९० च्या दशकापर्यंत "वॉशिंग्टन हे अमेरिकेतील सर्वात प्रसिद्ध आणि मान्यवर कृष्णवर्णीय व्यक्ती बनले होते." १८५६ मध्ये गुलाम म्हणून जन्माला आल्यावर काही दशकांनंतर त्यांच्या राष्ट्रीय प्रमुखतेमुळे १९०१ मध्ये त्यांनी राष्ट्रपती थियोडोर रूझवेल्टचा पाहुणा म्हणून व्हाइट हाउसमध्ये जेवण केलं. टस्केगीची स्थापना, न थकता देशभर व्याख्यानं देणं आणि कित्येक पुस्तकं लिहिणं याव्यतिरिक्त, वॉशिंग्टनने नॅशनल निग्रो बिझनेस लीगची स्थापना देखील केली. निग्रो बिझनेस लीग ही आर्थिक विकास संघटना आजही कार्यरत आहे. १९१५ मध्ये, ५९ वर्षांचे असताना त्यांचा मृत्यू झाला.

जेव्हा मी हे पुस्तक लिहायला सुरुवात केली, तेव्हा वॉशिंग्टनच्या राजकारणाशी माझा कमी संबंध होता आणि त्यांच्या मेहनत, शिस्त आणि आत्मनिर्भरतेच्या पुरस्कारात मला जास्त रस होता. स्वतःला सुधारण्यासाठीच्या त्यांच्या शोधातला मला सर्वात आकर्षक वाटणारा पैलू म्हणजे हॅम्पटन इंस्टिट्यूटकडे त्यांनी केलेला पाचशे मैलांचा प्रवास. नॉरेलच्या म्हणण्यानुसार, "एका गरीब निग्रो तरुणासाठी तो प्रवास तणाव आणि अनिश्चिततेने भरलेला होता." वॉशिंग्टनने त्याच्या दुसऱ्या आत्मचरित्रात जवळपास चार पानांवर त्या दुर्दैवी प्रवासाचं वर्णन केलं आहे. माझं काम होतं, त्याच्या साहस आणि दृढ संकल्पाच्या गोष्टीचा विस्तार करणं. “अप फ्रॉम स्लेव्हरी”मधून कळलेल्या वॉशिंग्टनच्या इतरही आठवणी मी मांडल्या, त्यांनी प्रवासादरम्यान अनुभवलेली दृश्यं, आवाज, आणि संवेदनांवर भर दिला. वॉशिंग्टनच्या शब्दांत, जेव्हा ते शेवटी हॅम्पटनला पोहोचले, तेव्हा त्यांनी निश्चय केला की “कितीही अडथळे आले तरीही माझं ध्येय साध्य करताना मी हार मानणार नाही." हे लहानसं पुस्तक वाचकांनाही यासारखा निश्चय करायला प्रेरणा देईल, अशी आशा करतो.

—जबरी आसिम

